तात्काळ सन २०१७-१८ मधील निधी वितरणाबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.९४/अर्थ-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ८ ऑगस्ट, २०१७.

वाचा :- शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक अर्थसं-२०१७/प्र.क्र.९४/अर्थ-३, दि. ३० जून, २०१७.

परिपत्रक

सन २०१७-१८ च्या अर्थसंकल्पीत निधीच्या खर्चावर नियंत्रण ठेवण्यासंदर्भात वाचा येथील दि. ३० जून, २०१७ च्या शासन परिपत्रकान्वये सर्व संबंधित प्रशासकीय विभागांना सूचना देण्यात आलेल्या आहेत. सदर सूचनांतील काही सूचनांमध्ये आता पुढील प्रमाणे बदल करण्यात येत आहे:-

परिच्छेद क्र. ४ (६) **बांधकाम विषयक प्रस्ताव** :-

**इमारत बांधकाम :-** बांधकाम विषयक प्रस्तावासंदर्भात प्रशासकीय मान्यता / तांत्रिक मान्यता तसेच आवश्यक तेथे सचिव समितीची मान्यता प्राप्त करुन कामनिहाय निधी अर्थसंकल्पित केल्याशिवाय विभागाने निधी सार्वजनिक बांधकाम विभागाकडे वर्ग करु नये व कार्यारंभ आदेश काढल्याशिवाय काम सुरू करू नये.

इमारत बांधकामासाठी निधीची तरतूद करताना संबंधित विभागांनी सर्व अपुर्ण बांधकामांसाठी आवश्यक असणारी तरतूद केल्यानंतरच नविन बांधकामांसाठी निधीची तरतूद करावी.

**रस्ते व पुल बांधकाम :-** सार्वजनिक बांधकाम विभागाने अपूर्ण असलेल्या व अर्थसंकल्पीत केलेल्या रस्ते व पुलांची हायब्रीड अन्युईटी व द्वैवार्षिक देखभाल दुरूस्तीची कामे पूर्ण करावीत. याव्यतिरिक्त नवीन कामांना प्रशासकीय मान्यता देताना निधीच्या उपलब्धतेची खात्री करावी व नंतरच कामे अर्थसंकल्पीय करावीत. हाती घेतलेली कामे प्राधान्याने पूर्ण करावीत.

परिच्छेद क्र. ५ **अ) शालेय शिक्षण विभाग** :- राज्यात शाळांचे जाळे जरी सर्वदूर पसरले असले तरी, शाळांची इष्टतम आवश्यकता तपासणे गरजेचे आहे. अल्प उपस्थिती असलेल्या सर्व शाळांची आवश्यकता तपासून व त्यामध्ये शिक्षण घेत असलेल्या मुलांची दुसरीकडे सोय करण्याची शक्यता तातडीने तपासून पहावी. तसेच यापुढे अनुदान घेत असलेल्या / अनुदानास पात्र ठरलेल्या / भविष्यात अनुदान उपलब्ध होणाऱ्या शाळांमध्ये शिक्षण सेवक / शिक्षक पदाची भरती करतांना दि. २३ जून, २०१७ रोजीच्या शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणे कार्यपध्दतीचे पालन करावे. क्षेत्रिय अधिकाऱ्यांनी शासनाच्या मान्यतेशिवाय अनुदान घेत असलेल्या / अनुदानास पात्र ठरलेल्या / भविष्यात अनुदान उपलब्ध होणाऱ्या शाळांमध्ये कोणत्याही शिक्षक/शिक्षकेतर पदांना मान्यता देऊ नये. शिक्षण संस्थांनी परस्पर शिक्षकांची भरती करु नये. अतिरिक्त शिक्षकांचे संपूर्णपणे समायोजन करण्यात यावे. नवीन विना अनुदानित शाळांना/तुकड्यांना तूर्तास मान्यता देण्यात येऊ नये. तथापि काही प्रकरणांमध्ये अशा प्रकारची मान्यता घ्यावयाची असल्यास त्यास शासनाची व भविष्यातील वित्तीय भाराच्या अनुषंगाने आवश्यकतेप्रमाणे वित्त व नियोजन विभागाची पूर्व मान्यता घेण्यात यावी.

परिच्छेद क्र. ५ **ब) उच्च व तंत्र शिक्षण विभाग** :- राज्यातील विद्यार्थ्यांचा कल पारंपारिक कला, विज्ञान, वाणिज्य या अभ्यासक्रमांकडून वैद्यकीय, अभियांत्रिकी, तत्सम तांत्रिक अभ्यासक्रमांकडे वळल्यामुळे पारंपारिक शिक्षण देणा-या संस्थांमधील विद्यार्थीसंख्या रोडावल्याचे आढळून येते. हीच परिस्थिती डि.एड./बी.एड./ बी.पी.एड. या अभ्यासक्रमांमध्येसुद्धा दिसून येते. अशा परिस्थितीत सर्वच संस्थांतील विद्यार्थी/शिक्षक-प्राध्यापक गुणोत्तराचा आढावा घेऊन तुकडीची/महाविद्यालयांची मान्यता रद्द करणे, तसेच रिक्त पदे न भरणे, पद संख्या कमी करणे या माध्यमातून खर्चावर नियंत्रण आणण्याच्या बाबी

विभागाने तपासाव्यात. अतिरिक्त शिक्षक / प्राध्यापकांचे संपूर्णपणे समायोजन करण्यात यावे. नवीन महाविद्यालयांना / तुकड्यांना तूर्तास मान्यता देण्यात येऊ नये. तथापि काही प्रकरणांमध्ये अशा प्रकारची मान्यता घ्यावयाची असल्यास त्यास शासनाची व वित्तीय भाराच्या अनुषंगाने आवश्यकतेप्रमाणे वित्त व नियोजन विभागाची पूर्व मान्यता घेण्यात यावी.

परिच्छेद क्र. ५ **ड) <u>ऊर्जा विभाग</u>** :- कृषीपंपधारक व यंत्रमागधारक यांना वीज बीलामध्ये देण्यात येणाऱ्या सवलतीपोटी राज्य शासनावर मोठा आर्थिक भार पडत आहे. सदर योजनांच्या पात्र लाभार्थ्यांचा आढावा उच्च पातळीवर घेणे आवश्यक आहे. तसेच वीज चोरीमुळे होणारे आर्थिक नुकसान टाळण्यासाठी कायद्याची काटेकोर अंमलबजावणी करण्यात यावी व कार्यवाहीसंदर्भात कसूरदार क्षेत्रिय अधिकाऱ्यांवर जबाबदारी निश्चित करण्याच्या बाबी विभागाने पडताळून पहाव्यात. वीज वितरणातील गळती रोखण्यासाठी इतर राज्यांनी अवलंबलेली कार्यपध्दतीं तसेच राज्यात खाजगी, सहकारी, शासकीय वा इतर वीज वितरण संस्थांद्वारे अवलंबण्यात आलेल्या उपाययोजना यांचा अभ्यास करुन सर्वोत्कृष्ट तंत्रज्ञानावर आधारित कालबध्द कार्यपध्दती राबविण्याबाबत विभागाने कार्यवाही करावी.

परिच्छेद क्र. ५ ग) **<u>कर्ज</u>** :- राज्य शासनावरील कर्जाचा वाढता बोजा तसेच व्याज व कर्जाच्या परतफेडीच्या अनुषंगाने येणारे वाढते दायित्व लक्षात घेता यापुढे विभागांनी विविध प्रकल्प/योजना यांच्यासाठी कर्ज घेण्याबाबतची प्राथमिक चर्चा संबंधित आर्थिक संस्थांशी करण्यापूर्वी वित्त विभागाची सहमती घ्यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१७०८०८१२१६३७१९०५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

V. Giriraj

Digitally signed by V. Giriraj
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0f8a41a8629e30394e8994b745f98093ff151c2ed299df4dd4bab22ea091a13a, cn=V. Giriraj
Date: 2017.08.08 12:06:59 +05'30'

**( वि. गिरीराज )**
अपर मुख्य सचिव ( व्यय ), वित्त विभाग

**प्रति,**

१) मा. राज्यपालांचे सचिव
२) मा. मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव
३) मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद/विधान सभा,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४) सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
५) सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) प्रधान सचिव/ सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७) सर्व सह सचिव / उप सचिव (अर्थसंकल्प शाखा), सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली ११०००१
९) प्रधान महालेखापाल - १/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
१०) प्रधान महालेखापाल - १/२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
११) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१३) निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
१४) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१५) सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी,वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) निवड नस्ती, अर्थसंकल्प-३, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.